उद्योग उपसंचालक (तांत्रिक), गट-अ (वेतनस्तर एस-२०, रु.५६१००-१७७५००) या पदावर तदर्थ पदोन्नती देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, उर्जा व कामगार विभाग

**शासन आदेश क्रमांकः पदोन्न-२०२२/प्र.क्र.१९९ /उद्योग-३**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

तारीख: २२ फेब्रुवारी, २०२३

**वाचा :**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३१०/कार्यासन-१२, दि.१५.१२.२०१७

२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांकः क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दि.०७.०५.२०२१

३) उद्योग संचालनालयाचे पत्र: उसं/आस्था/पदो/उ.उ.स(तां)/२०२२/अे-१३१६, दि.०५.१२.२०२२

४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: दिव्यांग-२०१५/प्र.क्र.१७१/१६-अ, दि.०५.०७.२०२१

५) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र. एसआरव्ही २०२०/प्र.क्र.४९/कार्या.१२, दि.१४.०७.२०२१

**प्रस्तावना :**

उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवरील उद्योग अधिकारी (तांत्रिक),गट-ब संवर्गातील कर्मचाऱ्यांना सन २०२२-२३ या निवडसुची वर्षाकरिता उपरोक्त अ.क्र. २ येथील शासन निर्णयातील तरतुदीनुसार, उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवरील उद्योग उपसंचालक (तांत्रिक), गट-अ या पदावर पदोन्नतीकरिता एकूण ०४ (नियमित पदोन्नती -०३ आणि तदर्थ पदोन्नती - ०१) पदांच्या नियमित तथा तदर्थ निवडसूचीस सामान्य प्रशासन विभागाने मान्यता दिलेली आहे. त्यापैकी श्री. अ. शि. बळे यांची विभागीय चौकशी व न्यायालयीन प्रकरण सुरू असल्याने उपरोक्त अ.क्र.१ येथील दि.१५.१२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने श्री. बळे यांचे प्रकरण दोन वर्षापेक्षा अधिक काळासाठी मोहोरबंद ठेवण्यात आले असल्याने सदर रिक्त पदावर श्री. बळे यांना तदर्थ स्वरुपात पदोन्नती देण्याबाबत सक्षम प्राधिकारी स्तरावर जाणीवपूर्वक निर्णय घेण्यात आलेला आहे. त्यामुळे असल्याने त्यांना तदर्थ स्वरुपात पदोन्नती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन आदेश:

उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवरील उद्योग अधिकारी (तांत्रिक), गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सेवाजेष्ठतेनुसार श्री. अ. शि. बळे यांची उद्योग उपसंचालक (तांत्रिक), गट-अ (वेतनस्तर

एस-२०, रु.५६१००-१७७५००) या पदावर खालील नमूद अटींच्या अधीन राहून तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे. तसेच खालीलप्रमाणे त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या पदावर त्यांना पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अक्र. | ज्येष्ठता क्रमांक | अधिकाऱ्यांचे नाव | पदस्थापनेचा महसूली विभाग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना कार्यालय |
|---|---|---|---|---|
| १ | ०६ | श्री. अ.शि.बळे | औरंगाबाद | महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, परभणी |

२. श्रीबळे यांना . पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे .

१) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि./१६-ब च्या दि.०७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सुचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे. तसेच दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर सहमती देण्यात येत आहे.

२) सदर पदोन्नती शिस्तभंगविषयक/ न्यायालयीन कार्यवाहीच्या अधिन दिली जाणारी तदर्थ पदोन्नती असेल व या तदर्थ पदोन्नतीमुळे नियमितपणाचे व सेवाज्येष्ठतेचे कोणताही हक्क मिळणार नाही. तसेच सदर पदावर संबंधिताचा कायमस्वरुपी धारणाधिकार राहणार नाही.

३) सदर तदर्थ पदोन्नती ही ११ महिने अथवा पुढील आदेशापर्यंत असेल तसेच कोणत्याही वेळी दिलेली तदर्थ पदोन्नती रद्द करुन मूळ पदावर पदावनत करण्याचा हक्क शासन राखून ठेवीत आहे. तसेच सदर तदर्थ पदोन्नतीस मुदतवाढ देण्याची कार्यवाही सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय दि.०१.०८.२०१९ मधील तरतुदीनुसार करण्यात येईल.

४) सदर निवडसूचीतील सेवाज्येष्ठतेनुसार पात्र असलेल्या तथापि पदोन्नती नाकारलेल्या अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीसंदर्भात या विभागाच्या दि.१२.०९.२०१६ च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्यात येईल.

३. पदोन्नतीनंतर पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी उपरोक्त अधिकाऱ्यांस याद्वारे एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत असून त्यांनी पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू व्हावे. याबाबतचा रुजू अहवाल संबंधित पदोन्नत अधिकाऱ्यांनी उद्योग संचालनालयामार्फत शासनास सादर करावा. तसेच त्यांनी अनाधिकृतपणे रजेवर जाऊ नये. तसेच पदस्थापना रद्द अथवा त्यात बदल करणेसाठी कोणत्याही स्वरुपाचे आवेदन सादर करु नये. तसे केल्यास सदर अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील, याची नोंद घ्यावी.

४. महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०१५ मधील २ (ड) येथील तरतुदीनुसार आणि उपरोक्त संदर्भ क्र. ३ येथील नमूद अधिसूचनेतील नियम क्र. १३ मधील तरतुदीनुसार पदोन्नतीने

नियुक्त होणाऱ्या सदर अधिकाऱ्यानी पदोन्नतीचे आदेश निघाल्याच्या तारखेपासून ३० दिवसांच्या विहीत मुदतीत रूजू होणे आवश्यक राहील. सदर मुदतीत रुजू न झाल्यास संबंधित अधिकाऱ्याचा अनुपस्थितीचा कालावधी अकार्यदीन (dies non) म्हणून गणला जाईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२२१८१३३१४३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHASHANK
TUKARAM CHAVAN

Digitally signed by SHASHANK TUKARAM CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7dd1791f8c7f2d8cbabbae6c3c11ac3d4fe93ccab49daf36ff24dacd585e2276, pseudonym=ECC424589A881E3E8CAB5C4F3152EABAEE38E22E, serialNumber=A089DF063F1FFA9C6E2D052DB3C26C5B1ECE40048A4A7D39615BEE66D9E2053D, cn=SHASHANK TUKARAM CHAVAN
Date: 2023.02.22 18:22:58 +05'30'

**(शशांक चव्हाण)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री (उद्योग ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव (उद्योग ) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
३) विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई ४०० ०३२.
४) महालेखापाल, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),१/२,महाराष्ट्र ,मुंबई/नागपूर.
५) उद्योग सहसंचालक, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
६) जिल्हा उद्योग केंद्र, परभणी.
७) अधिदान व लेखाधिकारी अधिकारी, मुंबई.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी
९) श्री. अ. शि. बळे, उद्योग उपसंचालक (तांत्रिक) (द्वारा उद्योग संचालनालय,मुंबई )
१०) निवडनस्ती (उद्योग-३).